महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या विविध योजनांसाठी समित्या / उप समित्या गठीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः सासंमं १०१४/प्र.क्र.९८/२०१४/भाषा-३**
**मराठी भाषा विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**तारीख: १ ऑक्टोबर, २०१४**

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र. बीएलसी १०६० के, दि.१९ नोव्हेंबर, १९६०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास १०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.३ मार्च, २०१०
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. बैठक २०१२/प्र.क्र.१/सेवा-५, दि.२४ मे, २०१२.

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या विविध योजनांचे कामकाज पहाण्यासाठी समित्या स्थापन करण्याचे अधिकार त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार अन्य सदस्य आमंत्रित करण्याचे अधिकार मंडळास प्रदान करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णय अधिक्रमित करुन नवीन शासन निर्णय निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास, मंडळाकडून विविध योजनांसाठी गठीत करण्यात येणा-या समित्या /उप समित्यांवर मंडळाच्या सदस्यांव्यतिरिक्त नवीन सदस्यांचा समावेश असलेल्या नवीन समित्या / उप समित्या गठीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(१) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने ज्या प्रकल्पासाठी समिती/उप समिती गठीत केली आहे त्या प्रकल्पाची संपूर्ण माहिती व प्रकल्प समितीची रचना शासनास अवगत करणे आवश्यक राहील.

(२) मंडळाच्या विविध समित्यांच्या / उप समित्यांच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयाची प्रत शासनास वेळोवेळी सादर करावी.

(३) मंडळाच्या सदस्यां व्यतिरिक्त नियुक्त करण्यात येणा-या सदस्यांची संख्या वाजवीपेक्षा जास्त होणार नाही याची दक्षता महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने घ्यावी.

२. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून गठीत करण्यात येणा-या समितीच्या/उप समितीच्या अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक- प्रवास-

१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च, २०१० व क्रमांक-बैठक-२०१२/प्र.क्र.१/सेवा-५, दिनांक २४ मे,२०१२ अन्वये निश्चित करण्यात आल्याप्रमाणे प्रवास भत्ता व बैठक भता अनुज्ञेय राहील.

३. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिका-यास याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. या वरील खर्च मागणी क्र. झेडएफ -०२, २२०५ - कला व संस्कृती - ०० -१०२ कला व संस्कृती प्रचालन (योजनेतर / योजनांतर्गत) अंतर्गत संबंधित उद्दीष्टाखाली मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००११४५६५२०३३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.10.01 15:09:15 +05'30'

**(वृषाली व.सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
५. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), महाराष्ट्र, मुंबई,
६. वित्त विभाग /व्यय -४ मंत्रालय, मुंबई,
७. सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
९. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१०. **भाषा - ३ (संग्रहार्थ).**